**तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२५ करीता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या १४०० दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- इतके अनुदान देण्यासाठी प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : बीजीटी-२०२४/प्र.क्र.५१/अर्थसंकल्प**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- १७ जून, २०२५

**वाचा :-**१) मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील दि.१४.०६.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त, नगर विकास विभाग, शासन पत्र क्र.बैठक-२०२४/प्र.क्र.२१८/नवि-१८, दि.२२.०६.२०२४

२) नगर विकास विभाग, शासन आदेश क्र.बैठक-२०२४/प्र.क्र.२१८/नवि-१८, दि.२२.०६.२०२४

३) शासन पत्र समक्रमांक दि.२४.०६.२०२४ व दि.२६.०६.२०२४

४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साप्र/२/आरआर/३३८/२०२४, दि.२५.०६.२०२४

५) शासन निर्णय समक्रमांक दि.०१.०७.२०२४ व दि.१४.०६.२०२५.

**प्रस्तावना :-**

तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.१४ जून, २०२४ रोजी पार पडलेल्या बैठकीत तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२४ करिता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या प्रत्येक दिंडीला रु.२०,०००/- इतके अनुदान सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत देण्याबाबत निदेश दिले आहेत. या संदर्भात आदर्श मानके निश्चित करण्यासाठी (Standard Operating Procedure) नगर विकास विभागाने दि.२२ जून, २०२४ रोजीच्या आदेशान्वये विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत केली असून सदर समितीने अहवाल सादर केला होता. त्यानुसार सन २०२४-२५ मध्ये एकूण ११०९ दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- अनुदान वाटप करण्यात आले होते. त्याचधर्तीवर तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२५ करिता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या ११०९ दिंड्यांना दि.१४.०६.२०२५ च्या शासन निर्णयान्वये प्रती दिंडी रु.२०,०००/- (अक्षरी रुपये वीस हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. मात्र मानाच्या पालख्यांसोबत जाणाऱ्या दिंड्यांची संख्या सुमारे १४०० इतकी असून त्यानुसार अनुदान वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२५ करिता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या एकूण १४०० दिंड्यांना प्रत्येकी रु.२०,०००/- इतके अनुदान वाटप करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या १४०० दिंड्यांपैकी दि.१४.०६.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये ११०९ दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- (अक्षरी रुपये वीस हजार फक्त) याप्रमाणे एकूण रु.२,२१,८०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकवीस लाख ऐंशी हजार फक्त) इतके अनुदान वाटप करण्याचा निर्णय घेण्यात आला असून आवश्यक निधी विभागीय आयुक्त, पुणे यांना वितरीत करण्यात आला आहे. विभागीय आयुक्त, पुणे यांनी १० पालख्यांमधील उर्वरित २९१ दिंड्यांचा तपशिल संबंधित पालख्यांकडून प्राप्त करुन दि.१४.०६.२०२५ च्या शासन निर्णयात विहित केल्याप्रमाणे सदर दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- (अक्षरी रुपये वीस हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी या शासन निर्णयान्वये उर्वरित दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- प्रमाणे वितरीत करावयाचा एकूण निधी रु.५८,२०,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावन्न लाख वीस हजार फक्त) उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.एन-३ मधील लेखाशिर्ष २२३५बी३६१, २६-जाहिरात व प्रसिध्दी" या उद्दिष्टाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा. सदरील योजेनेसाठी निधी वितरणास उपायुक्त सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच तहसिलदार सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" एक वेळची बाब म्हणून घोषित करण्यात आले आहे.

तसेच सदर अनुदानाची रक्कम कोषागारातून आहरित करण्यासाठी तहसिलदार सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना प्राधिकृत करण्यात आले आहे.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.४.२०१५ वित्तीय अधिकर नियम पुस्तिका, १९७८, भाग-१ उपविभाग-२, मधील अ.क्र.८, नियम क्र.१७, नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६१४/२०२५/व्यय-१४, दि.१४.०६.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१७१०५८५७१५२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.06.17 10:59:52 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव
६. मा मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. विभागीय आयुक्त, पुणे विभाग
८. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १ / २ मुंबई / नागपूर
१०. तहसिलदार सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे
११. अवर सचिव, रोखशाखा, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१५. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती (अर्थसंकल्प/विघयो)